**जेम्स ॲण्ड ज्वेलरी एक्सपोर्ट प्रमोशन कॉन्सिलद्वारे (GJEPC)महापे,नवी मुंबई येथे स्थापन होणाऱ्या मे. इंडिया ज्वेलरी पार्क तसेच या पार्कमध्ये स्थापित होणाऱ्या घटकांकरीता प्रोत्साहने लागू करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- साप्रोयो-२०२२/प्र.क्र.४३/उद्योग-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
**दिनांक :-२८ जून, २०२४**

वाचा:-

मा.मंत्रिमंडळ उपसमितीच्या दि.२८.०६.२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना:-**

राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय अशा दोन्ही स्तरावरील बाजापेठेत मुंबई येथून रत्ने आणि आभूषणांचा पुरवठा केला जात असून, मुंबईत रत्ने आणि दागिने क्षेत्रासाठी अनुकूल वातावरण आहे. जेम्स ॲण्ड ज्वेलरी क्षेत्र राज्याच्या निर्यातीत ८.९ बिलियन अमेरीकन डॉलर इतकी भरीव योगदान देत असून, देशाच्या निर्यातीत त्याचा वाटा २८ % इतका आहे. तसेच हे क्षेत्र राज्याच्या सकल राष्ट्रीय उत्पादनात सुमारे ७ % योगदान देत आहे. जेमोलॉजिकल इन्सिट्युट ऑफ इंडिया आणि इंडियन इन्स्टिट्युट ऑफ जेम्स ॲण्ड ज्वेलरी यासारख्या जागतिक दर्जाच्या संस्था मुंबईत आहेत.

राज्याचे जेम्स ॲण्ड ज्वेलरी क्षेत्रातील अग्रस्थान अबाधित राहण्याच्या दृष्टीने रत्ने व आभूषणे उद्योग क्षेत्रातील शिखर संस्था म्हणजेच जेम्स ॲण्ड ज्वेलरी एक्पोर्ट प्रमोशन कॉन्सिलद्वारे (GJEPC) नवी मुंबई येथील महापे औद्योगिक क्षेत्रात २१.३ एकर (८६०५३ चौ.मी.) जागेवर इंडिया ज्वेलरी पार्क स्थापित करण्यात येणार आहे. प्रस्तावीत इंडिया ज्वेलरी पार्क, महापे, नवी मुंबई हा रत्ने व आभुषणे क्षेत्रासाठी राज्यातील पथदर्शी प्रकल्प म्हणून स्थापित होत आहे. सदर प्रकल्पाद्वारे राज्यात रू.५०,००० कोटी गुंतवणूक व वार्षिक रू.१४,८०० कोटी इतक्या अपेक्षित निर्यातीमुळे व्यापकरित्या रोजगार व स्वयंरोजगार संधी निर्माण होऊन १,००,००० रोजगारनिर्मिती होणार आहे. राज्याचे जेम्स ॲण्ड ज्वेलरी क्षेत्रातील स्थान अबाधित राहण्याच्या दृष्टीने तसेच सदर प्रकल्पाचे अनन्यसाधारण महत्व व प्रकल्पाद्वारे होणारी गुंतवणूक व रोजगारनिर्मिती विचारात घेऊन, मा. मंत्रिमंडळ उपसमितीच्या दि. २८ जून,२०२३ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार या प्रकल्पास विशेष प्रोत्साहने अनुज्ञेय करण्यासाठी शासन मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मे.इंडिया ज्वेलरी पार्क,महापे,नवी मुंबई या प्रकल्पामुळे राज्यात गुणवत्तापुर्ण रोजगार संधी,निर्यात वाढ,अद्ययावत तंत्रज्ञानावर आधारित उत्पादन प्रक्रिया,राज्याच्या महसूलात भर,पर्यावरणपूरक उत्पादन प्रक्रिया, देशांतर्गत व देशाबाहेरील गुंतवणूक वृध्दी, पर्यटनास चालना, छोटया कारागिरासाठी तसेच कामगारासाठी आरोग्यदायी व उत्साहवर्धक कामकाज ठिकाण इ.बाबी साध्य होणार आहे. ही बाब विचारात घेऊन, मे.इंडिया ज्वेलरी पार्क यांना खालीलप्रमाणे प्रोत्साहने अनुज्ञेय करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

अ) **मे.इंडिया ज्वेलरी पार्क,महापे नवी मुंबई करीता प्रोत्साहने:-**

१) विशेष आर्थिक क्षेत्र (SEZ) योजने अंतर्गत ज्याप्रमाणे विकासकास जमिनीच्या भाडेपट्टा करारासाठी मुद्रांक शुल्क सवलत देण्यात येते, त्याचधर्तीवर मे.इंडिया ज्वेलरी पार्ककरीता जमिनीच्या भाडेपट्टा करारासाठी मुद्रांक शुल्क सवलत अनुज्ञेय करण्यात येत आहे.

२) सदर पार्ककरीता महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळामार्फत ३ चटई क्षेत्र निर्देशांक (FSI) यापूर्वी दिलेला आहे. सदर पार्ककरीता अतिरिक्त २ चटई क्षेत्र निर्देशांक (FSI) अनुज्ञेय करण्यात येत आहे. या अतिरिक्त २ चटई क्षेत्र निर्देशांक (FSI) पैकी (अ) १ चटई क्षेत्र निर्देशांक (FSI) लॅब ग्रोन डायमंडस उद्योगासाठी वापरण्यात यावा, व (ब) उर्वरीत १ अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक वापरुन बांधकाम करुन विकसित केलेले क्षेत्र महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळास विनामूल्य हस्तांतरीत करण्यात यावे या अटीच्या अधीन राहून अतिरिक्त एकूण २ चटई क्षेत्र निर्देशांक अनुज्ञेय करण्यात येत आहे.

सदर विकसित क्षेत्र जेम्स ॲण्ड ज्वेलरी तसेच लॅब ग्रोन डायमंड क्षेत्राशी निगडीत अन्य उद्योगांना देण्याकरीता राखीव ठेवण्यात येऊन,अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (उद्योग) यांचे आदेशानुसार वेळोवेळी पुढील कार्यवाही करण्यात यावी.

**आ) मे.इंडिया ज्वेलरी पार्कमध्ये स्थापित होणाऱ्या घटकांकरीता प्रोत्साहने:-**

प्रस्तावित पार्कमध्ये सुमारे २००० सूक्ष्म, लघु व मध्यम उद्योग घटक स्थापित होणार आहेत. इंडिया ज्वेलरी पार्क, मुंबई मध्ये स्थापित होणाऱ्या घटकांद्वारे रु. ५०,०००/- कोटींची गुंतवणूक होणार असून देशातील असा हा एकमेव प्रकल्प असल्यामुळे, मे. इंडिया ज्वेलरी पार्क,महापे, नवी मुंबई मध्ये स्थापित होणाऱ्या घटकांकरीता खालील प्रोत्साहने अनुज्ञेय करण्यात येत आहे.

१) मे.इंडिया ज्वेलरी पार्कमध्ये स्थापित होणाऱ्या घटकांकरीता पहिल्या भाडेपट्टा करारावर मुद्रांक शुल्क सवलत.

२) पार्कमध्ये स्थापित होणाऱ्या घटकांना ५ वर्षापर्यंत ५०% ढोबळ वस्तू व सेवा कराचा परतावा.

३) लॅब ग्रोन डायमंडस उद्योग हा नवीन सेक्टर राज्यात विकसित होण्याकरीता एक विशेष बाब म्हणून या घटकांसाठी रु. २ प्रति युनिट दराने ५ वर्षांसाठी विद्युत दर सवलत.

४) सर्व घटकांसाठी ५ वर्षापर्यंत विद्युत शुल्क माफी.

५) उपरोक्तप्रमाणे सर्व प्रोत्साहने प्रति घटक पात्र गुंतवणूकीच्या १०० टक्के मर्यादेत अनुज्ञेय राहतील.

२. सदर निर्णयाच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने सदर पार्ककरीता जमिन हस्तांतरण व अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक अनुज्ञेय करण्याच्या अनुषंगाने योग्य ती पुढील कार्यवाही महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई यांचेमार्फत करण्यात यावी.

३. मे.इंडिया ज्वेलरी पार्क तसेच या पार्कमध्ये स्थापित होणाऱ्या घटकांना वर नमूद केल्यानुसार मुद्रांक शुल्क सवलत अनुज्ञेय करण्याच्या अनुषंगाने आवश्यक ती अधिसूचना महसूल व वन विभागामार्फत निर्गमित करण्यात यावी.

**४.** सदर शासन निर्णय मा.मुख्यमंत्री यांचे अध्यक्षतेखाली स्थापित मा.मंत्रिमंडळ उपसमितीच्या दि.२८.०६.२०२३ रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२४०६२९१४४८४२४९१० असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VINOD SOPANRAO MENDHE

Digitally signed by VINOD SOPANRAO MENDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT,
2.5.4.20=3dfd984bb7c5aede090473e34b1c93fa9f36d97d56c0cf07812a43c5ca5d6a24, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=6CAF7EAF9A975C60BD4278CDB26344D74E2548D2175C80BA946EF0383ABE5111, cn=VINOD SOPANRAO MENDHE
Date: 2024.07.01 13:21:00 +05'30'

**( विनोद मेंढे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय,मुंबई
२. मा.उप मुख्यमंत्री (गृह व विधी) यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
३. मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
४. मा.मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
५. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र शासन,मंत्रालय,मुंबई
६. मा.अपर मुख्य सचिव,महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई.
७. अ.मु.स./प्र.स./सचिव, सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,मंत्रालय,मुंबई
८. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय,नवीन प्रशासकीय भवन,मुंबई.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, अंधेरी (पूर्व), मुंबई.
१०. अध्यक्ष,दि जेम्स अण्ड ज्वेलरी एक्सपोर्ट प्रमोशन कॉन्सील,ऑफीस क्र.AW १०१०,जी ब्लॉक,टॉवर ऐ,वांद्रे-कुर्ला कॉम्प्लेक्स,वांद्रे (पू),मुंबई-५१
११. प्रधान सचिव (उद्योग), यांचे स्वीय सहाय्यक, उद्योग, उर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. सह सचिव (उद्योग-८), यांचे स्वीय सहाय्यक, उद्योग, उर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती (उद्योग-८)